प्रकल्पबाधितांच्या पुनर्वसित गावांना
नागरी सुविधा पुरविण्यासाठी होणा-या
खर्चाचे प्रमाण ...

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

## शासन निर्णय क्र. आरपीए-२०१५/प्र.क्र. २१४/र-१

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०००३२
दिनांक २३/९/२०१५

वाचा :- १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक. आरपीए-१०८६/ सीआर-३९८१/र-१, दिनांक २४ नोव्हेंबर, १९८६.
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक. आरपीए-२००८/ प्र.क्र ५५०/र-१, दिनांक १ ऑगस्ट, २००९.

**प्रस्तावना :**

पाटबंधारे, वीज व अन्य प्रकल्पामुळे जी गावठाणे बाधीत होतात त्यातील प्रकल्पबाधित व्यक्तींचे नवीन वसाहतीमध्ये पुनर्वसन करण्यात येते. अशा पुनर्वसित वसाहतीमध्ये महाराष्ट्र प्रकल्प बाधित व्यक्तींचे पुनर्वसन अधिनियम १९९९ अनुसार एकुण १८ नागरी सुविधा आणि भूमिसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम, २०१३ अनुसार २५ नागरी सुविधा प्रकल्प यंत्रणेमार्फत उपलब्ध करुन देणे वैधानिकरित्या बंधनकारक आहे. त्यामुळे प्रकल्पबाधित व्यक्तींच्या पुनर्वसनासाठी देण्यात येणाऱ्या निधीची प्रकल्प किंमतीच्या ५% ची असलेली प्रचलीत मर्यादा विधीग्राहय राहत नाही. म्हणून पुनर्वसनाच्या खर्चावरील प्रकल्प किंमतीच्या ५% ची मर्यादा शिथिल करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

प्रकल्पबाधित व्यक्तीच्या पुनर्वसित वसाहतींना प्रचलीत अधिनियमानुसार विहीत नागरी सुविधा पुरविण्यासाठी निश्चित करण्यात आलेली प्रकल्प खर्चाच्या ५% ची मर्यादा शिथील करण्यास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे.

१९७६ पूर्वी व १९७६ नंतरच्या सर्व मंजूर प्रकल्पांच्या संदर्भात खालील प्रमाणे कार्यवाही करणे अपेक्षित राहील.

१) पुनर्वसित/ विस्तारीत वसाहतीमध्ये पुरवावयाच्या नागरी सुविधांसंदर्भात संदर्भीय अ.क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मानके निश्चित करण्यात आली आहेत. त्या मानकानुसार नागरी सुविधांची कामे करणे बंधनकारक राहील.

२) प्रचलित पध्दतीनुसार ज्या प्राधिकाऱ्यास प्रशासकीय मान्यतेचा आधिकार आहे. त्यांनी कामांना प्रशासकीय मान्यता द्यावयाची असून प्रशासकीय मान्यतेसाठी विचार करतांना ५% ची मर्यादा लागू राहणार नाही.

३) सदर शासन निर्णय निर्गमित झाल्यानंतर नव्याने मंजूर होणाऱ्या प्रकल्पाबाबत प्रकल्प यंत्रणेने एखाद्या प्रकल्पाचे अंदाजपत्रक व आराखडे तयार करतांना पुनर्वसनाच्या खर्चासाठी आवश्यक असलेला निधी प्रकल्प खर्चात ग्रहीत धरुन एकूण प्रकल्पाची लाभ व्यय गुणोत्तर (cost benefit analysis) करणे अनिवार्य राहील.

सदर शासन निर्णय जलसंपदा, उद्योग, उर्जा, कामगार, नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने अनौ.संदर्भ क्र.२६६/२०१५/व्यय-१०, दि. १९.८.२०१५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र २०१५०९२३१३१८३५५११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shobha Vijaykumar Patki

Digitally signed by Shobha Vijaykumar Patki
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shobha Vijaykumar Patki
Date: 2015.09.23 13:24:43 +05'30'

**(शोभा वि.पत्की)**
अवर सचिव, महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव,
५. सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. सर्व विभागीय आयुक्त.
८. सर्व जिल्हाधिकारी.
९. सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी.
१०. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे,
११. सर्व कार्यासने (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती कार्यासन र-१ .